**यांत्रिकी भवन, दापोडी व यांत्रिकी कर्मशाळा, दापोडी तसेच यांत्रिकी वसाहती सांगवी व दापोडी येथील स्थापत्य कामांसाठी कक्ष कार्यान्वित करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आढावा-२०१८/प्र.क्र.३०/२०१८/आ.(प्रशि.),**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख : ३१ जुलै, २०१८.

<u>वाचा</u> : १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. १०९२/सीआर/८०६/व्यय-६, दि.१५/१०/१९९२.
२) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.आढावा-२०१७/प्र.क्र.२७३/२०१७/आ.(प्रशि.), दि.१०.०१.२०१८.

**<u>प्रस्तावना :-</u>**

संदर्भिय अ.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये नियोजन व संकल्पचित्र विभाग, दापोडी-पुणे व (१) स्थापत्य बांधकाम व यांत्रिकी उपविभाग, दापोडी-पुणे, (२) संकल्पचित्र उपविभाग, दापेडी-पुणे, (३) यांत्रिकी इमारत उपविभाग, नाशिक व (४) गुण नियंत्रण व निरीक्षण उपविभाग क्र.१, दापोडी-पुणे या कार्यालयांतर्गत पुरेशी कामे शिल्लक नसल्याने, बंद करण्यात आली आहेत. या कार्यालयांपैकी नाशिक येथील उपविभागीय कार्यालय वगळता, संबंधित विभागीय व उपविभागीय कार्यालये दापोडी, पुणे येथील शासकीय इमारतीच्या जागेत कार्यरत होती. तथापि, दापोडी येथील यांत्रिकी भवन, यांत्रिकी कर्मशाळा तसेच सांगवी व दापोडी येथील यांत्रिकी वसाहती या शासनाच्या स्थावर मालमत्तेच्या रक्षणासाठी तसेच त्याचे देखभाल व दुरुस्तीसाठी प्रशासकीय कारणास्तव पुणे मुख्यालयी कमीत कमी आस्थापनेचा स्थापत्य कक्ष कार्यान्वित करुन, या कक्षाचे संनियंत्रण कार्यकारी अभियंता, यांत्रिकी भांडार विभाग, दापोडी पुणे यांचे नियंत्रणाखाली कार्यरत पोलाद उपविभाग, दापोडी-पुणे उपविभागीय कार्यालयास संलग्न करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

संदर्भिय क्र.२ अन्वये, मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक अंतर्गतचे नियोजन व संकल्पचित्र विभाग, दापोडी-पुणे हे विभागीय कार्यालय त्याच्या संनियंत्रणाखाली कार्यरत उपविभागीय कार्यालयांसह बंद करण्यात आले आहे. दापोडी येथील यांत्रिकी भवन, यांत्रिकी कर्मशाळा तसेच सांगवी व दापोडी येथील यांत्रिकी वसाहती या शासकीय मालमत्तेच्या रक्षणासाठी तसेच त्याची देखभाल व दुरुस्तीसाठी प्रशासकीय कारणास्तव स्थापत्य कक्ष, पुणे या नावाने कार्यान्वित करण्यास, याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. स्थापत्य कक्ष, पुणे हे कार्यालय कार्यान्वित करण्यास, पुढील अटींच्या अधीन राहून मान्यता प्रदान करण्यात येत आहे.:-

- स्थापत्य कक्ष, पुणे या कक्षाचे संनियंत्रण कार्यकारी अभियंता, यांत्रिकी भांडार विभाग, दापोडी पुणे यांचे नियंत्रणाखाली कार्यरत पोलाद उपविभाग, दापोडी या उपविभागीय कार्यालयांतर्गत राहील.
- स्थापत्य बांधकाम व यांत्रिकी उपविभाग, दापोडी-पुणे (मुलकी बांधकाम व दुरुस्ती उपविभाग, दापोडी-पुणे) अंतर्गतच्या मंजूर पदांपैकी १-कनिष्ठ अभियंता किंवा शाखा अभियंता (स्थापत्य), १-कनिष्ठ लिपिक किंवा लिपिक-टंकलेखक व २-चौकीदार अशा प्रकारे ४ पदांसह स्थापत्य कक्ष, पुणे हे कार्यालय कार्यरत राहील.
- शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही, याद्दष्टीने या कक्ष कार्यालयासाठी दापोडी पुणे येथील बंद केलेल्या कार्यालयातील उपलब्ध साहित्याचा वापर करुन, शासकीय इमारतीच्या जागेत कार्यान्वित करण्यात यावे.
- कक्षांतर्गतच्या स्थापत्य कामांचे तांत्रिक तसेच कनिष्ठ अभियंता/ शाखा अभियंता (स्थापत्य) यांचे प्रशासकीय नियंत्रण अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे यांचेकडे राहील.
- या कक्षासाठी वित्तीय बाबींसंदर्भात वित्त विभाग, शासन निर्णय क्र.ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/ एडीएम-९, दि.०८.०३.१९८४ मधील तरतूदीनुसार अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, पुणे हे "नियंत्रक अधिकारी" व कार्यकारी अभियंता, यांत्रिकी भांडार विभाग, पुणे हे "आहरण व संवितरण अधिकारी" राहतील.

३. स्थापत्य कक्ष, पुणे या कक्षासाठी आवश्यक असलेली गट-"क" व गट-"ड" मधील कर्मचाऱ्यांची सेवा स्थानिक परिमंडळ कार्यालयाने उपलब्ध करुन द्यावी.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.१०९२/सीआर-८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०७३११६५३१९४८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Sunil Gangaram Gangarkar

Digitally signed by Sunil Gangaram Gangarkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8b2512fdfec4104829bc2f439e33adb2e3f823a285cfade8149e690564bc13f6, cn=Sunil Gangaram Gangarkar
Date: 2018.07.31 16:57:23 +05'30'

**(सु. गं. गांगरकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
४. मा.मंत्री (खारजमीन) यांचे खाजगी सचिव.
५. मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक.
६. मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद / विधान सभा.
७. मा. विधान परिषद / विधान सभा सदस्य (सर्व).
८. प्रधान सचिव (ज.सं.प्र.व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१२. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
१३. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४. महासंचालक, संकलन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षा, नाशिक. (DTHRS)
१५. सर्व कार्यकारी संचालक, महामंडळ कार्यालये.
१६. सह सचिव (प्रशा.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१९. मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक
२०. आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. उप सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. उप सचिव (आस्था.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
२४. अधीक्षक अभियंता, पुणे यांत्रिकी मंडळ, पुणे.
२५. अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे.
२६. अधीक्षक अभियंता, ई-प्रशासन मंडळ, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२७. कार्यकारी अभियंता, यांत्रिकी भांडार विभाग, दापोडी, पुणे.
२८. कार्यकारी अभियंता, प्रशासकीय संगणकीकरण विभाग, पुणे.
(विभाग व उपविभागीय कार्यालयांमध्ये झालेल्या बदलाची आवश्यक ती नोंद घेण्यास्तव)
२९. उप अभियंता, पोलाद उपविभाग, दापोडी, पुणे.
३०. सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३१. आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ.

******************